

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग,

मुख्य इमारत, पहिला मजला,मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID : deskkh२-rfd@mah.gov.in

---

क्रमांक :गौखनि-४०अ/०७१४/प्र.क्र.३५७/ख-२ दिनांक : १७ जून, २०२५

**विषय:- गौण खनिज-जालना**

सन २०१३-२४ करीता मौजे बानेगांव, ता.घनसावंगी, जि. जालना व मौजे राहेरी, ता. गेवराई, जि. बीड या संयुक्त वाळूगटाच्या लिलावाची रक्कम परत करणेबाबत-.मे. लक्ष्मी कॉन्ट्रॅक्टर तर्फे प्रो.प्रा. श्री. दिगंबर भाऊसाहेब लवाळे

**शासन ज्ञापन :-**

जिल्हाधिकारी, जालना यांना त्यांचे पत्र क्र.२०२५/मशाका/गौख/कावि, दिनांक ३०.०४.२०२५ रोजीच्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१३-१४ च्या लिलावात मौजे बानेगाव, ता. घनसावंगी, जि. जालना व मौजे राहेरी, ता. गेवराई, जि. बीड या संयुक्त वाळुघाटातील ९७१७ ब्रास वाळूचा लिलाव अर्जदार श्री. दिगंबर भाऊसाहेब लवाळे यांनी सर्वोच्च बोली रुपये ३९,३६,८००/- एवढ्या रकमेस मंजूर करण्यात आला होता. परंतु, लिलावधारक यांनी संयुक्त वाळूगटाची अनामत रक्कम जिल्हाधिकारी यांच्याकडे जमा करण्याबाबत पत्र देण्यात आले तरीही लिलावधारक यांनी अनामत रक्कम शासन जमा केली नाही. तसेच लिलावधार यांना करारनाम्यासाठी रू.१००/- चा बॉन्ड पेपर उपलब्ध करून दिलेला नसल्याने सदर संयुक्त वाळूघाटाच्या अनुषंगाने लिलावधारक यांना कार्यारंभ आदेश देण्यात आला नाही.

०२. तदनंतर लिलावधारक श्री. दिगंबर भाऊसाहेब लवाळे प्रो.प्रा. लक्ष्मी कॉन्ट्रक्टर यांनी मौजे बानेगाव, ता. घनसावंगी, जि. जालना व मौजे राहेरी, ता. गेवराई, जि. बीड या संयुक्त वाळूगटातून वाळू उत्खननास मुदतवाढ मिळण्याबाबत किंवा वाळूगट बदली मिळण्याबाबत मा. मंत्री (महसूल) यांच्यासमोर अपील अर्ज दाखल केला असता, सदर अपिल अर्जाच्या अनुषंगाने तत्कालीन मा.राज्यमंत्री (महसूल) यांनी दिनांक ०९.०९.२०१४ च्या आदेशान्वये वाळूगटाची अनामत रक्कम विहीत वेळेत जमा केलेली नसल्याने लिलावधारक यांनी लिलावातील अटीचे पालन केलेले नसल्याने शासनाच्या महसूलाचे होणारे संभाव्य नुकसान पाहता लिलावधारक यांचे अपील अर्ज अमान्य केले.

०३. सदर आदेशाविरूध्द लिलावधारक यांनी मा. न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका १४६२/२०२२ च्या अनुषंगाने दिनांक ०७.०४.२०२५ रोजी सदर आदेश मिळाल्याच्या तारखेपासून चार आठवड्याच्या आत संपूर्ण रक्कम रू.३९,३६,८००/- परत करण्याचे निर्देश दिले आहे. मा. न्यायालयाने दिनांक ०७.०४.२०२५ रोजी दिलेल्या आदेशातील नोंदविण्यात आलेले निरीक्षण विचारात घेवून, सन २०१३-२०१४ करीता मौजे बाणेगांव, ता.घनसावंगी, जि. जालना व मौजा राहेरी, ता.गेवराई, जि.बीड ह्या संयुक्त वाळू घाटाच्या अनुषंगाने मे. लक्ष्मी कॉन्ट्रॅक्टर तर्फे प्रो.प्रा.श्री.दिगंबर भाऊसाहेब लवाळे यांनी भरणा केलेली रक्कम रू.३९,३६,८००/- परत (रुपये एकोणचाळीस लाख छत्तीस हजार आठशे फक्त) इतकी लिलावधारकास परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०४. लिलावधारक यांनी सदर रक्कम शासनास जमा केली याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर लिलावामध्ये शासनास जमा करण्यात आलेली रक्कम रू.३९,३६,८००/- परत (रुपये एकोणचाळीस लाख छत्तीस हजार आठशे फक्त) अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

०५. या बाबीवर होणारा खर्च सन २०२५-२०२६ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०६.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दिनांक ०८.०८.२१०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०७.** सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०६१७१२४५४५२०१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने**,**

SADANAND GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2025.06.17 12:46:57 +05'30'

**(सदानंद गो माहिते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, जालना**

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.

३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), नागपूर.

४) जिल्हा कोषागार अधिकारी, जालना

५) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

६) निवडनस्ती (कार्यासन "ख-२"), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.